अहमदनगर जिल्ह्यामधील दुष्काळग्रस्त भागातील पशुधनाकरीता संत जनाबाई महिला मंडळ, हनुमान टाकळी, ता. पाथर्डी, जि. अहमदनगर या संस्थेच्या गोशाळेमध्ये राहत व चारा शिबीर (कॅटल रिलीफ कॅम्प ॲण्ड फॉडर कॅम्प) सुरू करण्यास मान्यता देण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन आदेश क्रमांक- पविआ-१०१९/प्र.क्र.५० /पदुम-३**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.**
**दिनांक:- ५ फेब्रुवारी, २०१९**

**वाचा :-** १) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. पविआ-२०१६/प्र.क्र.११४/पदुम-३, दिनांक २६.०४.२०१७
२) कृषि व पदुम विभाग, शासन आदेश क्र. पविआ-१०१८/प्र.क्र.३२/पदुम-३, दिनांक ३१.०३.२०१८
३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. एससीवाय - २०१८/प्र.क्र.८९ /म-७, दिनांक ३१.१०.२०१८
४) कृषि व पदुम विभाग, शासन आदेश क्र. पविआ-१०१९/प्र.क्र.१७/पदुम-३, दिनांक ०९.०१.२०१९
५) जिल्हाधिकारी, अहमदनगर यांच्या कार्यालयाचे क्र टंचाई/ कार्या १९ ट/आव्य/ २७/ २०१९, दिनांक २१/०१/२०१९ चे पत्र.

## शासन आदेश

दुष्काळ व्यवस्थापन संहिता, २०१६ मधील कार्यपध्दतीनुसार संदर्भाधीन अ.क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये, सन २०१८ च्या खरीप हंगामामध्ये राज्यातील दुष्काळी तालुके घोषित करण्यात आलेले आहेत.

२. तसेच, दुष्काळी कालावधी करीता तातडीने उपाययोजना सुचविण्यासाठी / सनियंत्रण ठेवण्यासाठी / निर्णय घेण्यासाठी गठीत करण्यात आलेल्या मंत्रिमंडळ उपसमितीने यापूर्वी मराठवाड्यातील तीव्र दुष्काळग्रस्त जिल्ह्यामध्ये **गोवर्धन गोवंश सेवा केंद्र** या योजनेंतर्गत ज्या गोशाळांना रु. १.०० कोटीचे अनुदानासाठी निवड करण्यात आलेली आहे किंवा अनुदान मंजूर करण्यात आलेले आहे, अशा गोशाळांमध्ये प्रायोगिक तत्वावर त्या परिसरातील पशुधनासाठी **पशुधन राहत व चारा शिबीर (कॅटल रिलीफ ॲण्ड फॉडर कॅम्प)** तात्काळ प्रभावाने सुरू करण्यास मान्यता दिलेली आहे. त्यानुसार संदर्भाधीन क्र ४ येथील आदेश निर्गमीत करण्यात आलेले आहेत.

३. जिल्हाधिकारी, अहमदनगर यांच्या कार्यालयाने संदर्भाधीन अ.क्र. ५ येथील दिनांक २१/०१/२०१९ च्या पत्रान्वये अहमदनगर जिल्हयातील दुष्काळग्रस्त भागातील पशुधनासाठी गोशाळेमार्फत पशुधन राहत व चारा शिबीर सुरु करण्याची आवश्यकता असल्याचे कळविले आहे.

४. वर नमुद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, अहमदनगर जिल्हयाच्या दुष्काळग्रस्त परिसरातील पशुधनासाठी **संत जनाबाई महिला मंडळ, हनुमान टाकळी, ता. पाथर्डी, जि. अहमदनगर** या संस्थेच्या गोशाळेमध्ये **पशुधन राहत व चारा शिबीर (कॅटल रिलीफ ॲण्ड फॉडर कॅम्प)** तात्काळ प्रभावाने सुरू करण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

५. या शासन आदेशा सोबत जोडण्यात आलेल्या प्रपत्रातील अटी व शर्तींच्या अधीन राहून, सदरची मान्यता देण्यात येत आहे. तसेच यासंदर्भात शासनाकडून वेळोवेळी निर्गमित करण्यात येणारे आदेश / निर्देश / सूचनांचे पालन करणे, वरील संस्थांना बंधनकारक राहील.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२०५१५०११९९००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vikas Tulshiram Kadam

Digitally signed by Vikas Tulshiram Kadam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9869ec61c857e78e82b7a19b04c6d22f8ef1b8dbc9b19d45ef776d80ef148059, cn=Vikas Tulshiram Kadam
Date: 2019.02.05 15:03:47 +05'30'

**(विकास तु. कदम)**
शासनाचे अवर सचिव

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे- ७.
३. सर्व जिल्हाधिकारी (मुंबई व मुंबई उपनगर वगळून)
४. सर्व प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन,
५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
६. मा. मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
७. मा. राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
८. सर्व जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त,
९. सर्व जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र- १/२, मुंबई / नागपूर.
११. महसूल व वन विभाग (म-७), मंत्रालय, मुंबई-३२.
१२. अध्यक्ष/सचिव, संत जनाबाई महिला मंडळ, हनुमान टाकळी, ता. पाथर्डी, जि. अहमदनगर
१३. निवड नस्ती (पदुम- ३)

**शासन आदेश क्रमांक- पविआ-१०१९/प्र.क्र.५०/पदुम-३, दिनांक- ०५/०२/२०१९ च्या सोबतचे सहपत्र**

**प्रपत्र**

**दुष्काळग्रस्त तालुक्यामधील गोशाळांमध्ये पशुधनाकरीता राहत व चारा शिबीर (कॅटल रिलीफ ॲण्ड फॉडर कॅम्प) सुरू करण्यासंदर्भातील अटी व शर्ती**

१. पशुधनाच्या शिबीरात लहान व मोठे मिळून किमान ५०० व अधिकत्तम ३००० पेक्षा अधिक पशुधनाचा समावेश करता येणार नाही.

२. या सवलती प्रत्येक पशुधन पालकांना त्यांच्याकडे असलेल्या पशुधनापैकी जास्तीत जास्त १० पशुधनापर्यंत (लहान व मोठे) मर्यादीत असेल.

३. जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त किंवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या पशुसंवर्धन विभागातील अधिकारी/ कर्मचारी यांच्या पत्राशिवाय पशुपालकांच्या पशुधनांना अशा शिबीरात प्रवेश देता येणार नाही.

४. सदर शिबीरात प्रवेश दिलेल्या पशुधनाचा अपघात किंवा नैसर्गिक/अनैसर्गिक मृत्यु झाल्यास, संबंधीत पशुपालकास शासनामा८फत कोणतीही नुकसान भरपाई मिळणार नाही. यासाठी संबंधीत पशुपालकांकडून बंधपत्र करुन घेण्याची जबाबदारी संबंधीत गोशाळा संस्था चालकाची राहील, असे बंधपत्र लिहून घेतले नसल्यास, अशा परिस्थितीत मृत्यू झालेल्या पशुधनाची नुकसान भरपाई संबंधीत गोशाळा संस्था चालकाने संबंधित पशुपालकास द्यावी लागेल.

५. संबंधीत गोशाळा संस्था चालकाने दररोज सकाळी ८.०० वाजता शिबीरातील पशुधनाची संख्या जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त यांनी प्राधिकृत केलेल्या पशुसंवर्धन विभागातील अधिकारी/ कर्मचारी यांना कळविणे आवश्यक आहे. पशुपालकांना शेतीच्या कामासाठी पशुधन घेवून जाणे असल्यास, सकाळी ८.०० पूर्वी घेवून जाणेस परवानगी देण्यात यावी.

६. शिबिरातील पशुधनासाठी प्रतिदिन, प्रति मोठे पशुधन ₹ ७०.०० व प्रतिदिन, प्रति लहान पशुधन ₹ ३५/- इतके अनुदान अनुज्ञेय राहील. सदरील अनुदान शासनाकडून वेळोवेळी उपलब्ध करुन देण्यात येईल.

७. सदर शिबिर चालविणाऱ्या संस्थेस टंचाई कालावधी किंवा पशुधनाची शिबीर चालू असेपर्यंत, या पैकी जो कालावधी कमी असेल, त्या कालावधीसाठी वरील प्रमाणे अनुदान अनुज्ञेय राहील.

८. संबंधीत गोशाळा संस्था चालकास शासनाच्या पूर्व परवानगी शिवाय उक्त शिबीर बंद करता येणार नाही. असे केल्यास संबंधीत संस्थेकडून शिबिर बंद केल्याच्या दिनांकापासून मागील १५ दिवसाचे अनुदान वसुल करण्यात येईल, त्याचप्रमाणे गोवर्धन

गोवंश या योजनेअंतर्गत मंजूर करण्यात आलेल्या अनुदानापैकी वितरीत न केलेले, अनुदान बंद करण्यात येईल.

९. शिबिरातील पशुधनास प्रति दिन, प्रती मोठया पशुधनास ६ किलोग्रॅम वाळलेली वैरण किंवा १५ किलोग्रॅम ओला / हिरवा चारा आणि आठवड्यातून ३ दिवस १ दिवसाआड १ किलोग्रॅम पशुखाद्य, तसेच प्रति दिन, प्रति लहान पशुधनास ३ किलो ग्रॅम वाळलेली वैरण किंवा ७.५ किलोग्रॅम ओला / हिरवा चारा आणि आठवड्यातून ३ दिवस १ दिवसाआड अर्धा किलोग्रम पशुखाद्य देणे आवश्यक आहे. त्याचप्रमाणे शिबीरात दाखल झालेल्या मोठ्या व लहान पशुधनास पिण्यासाठी पुरेशा प्रमाणात स्वच्छ पाणी उपलब्ध करुन देण्यात यावे.

१०. शिबिरातील चाऱ्याची प्रत पशुधनास खाण्या योग्य असावी. जर पशुसंवर्धन विभागाने चारा तपासणी अंती, चारा पशुधनास खाण्यास अयोग्य आहे, अशी शिफारस केल्यास संबंधीत गोशाळेच्या संस्थेवर दंडणीय कार्यवाही करण्यात येईल.

११. दैनंदिन चारा / आहार वाटप, चारा / आहार खरेदी, संस्थेमध्ये दाखल होणाऱ्या पशुधनाची नोंदवही व दैनंदिनी व अनुषंगीक बाबींच्या नोंदवह्या दररोज अद्ययावत ठेवणे ही सर्वस्वी जबाबदारी संबंधित गोशाळा संस्था प्रमुखाची राहील.

१२. तसेच वेळोवेळी भेट देणाऱ्या जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त किंवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या पशुसंवर्धन विभागातील अधिकारी / कर्मचाऱ्यास किंवा जिल्हाधिकारी यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास रेकॉर्ड तपासणीकामी उपलब्ध करुन देण्यात यावे. पशुधनाच्या अवास्तव नोंदी आढळून आल्यास शिबीर चालू झाल्याच्या दिनांकापासून संबंधित गोशाळा संस्थेविरुध्द दंडनीय कारवाई करण्यात येईल.

१३. गोशाळा संस्था चालकाने पशुधनाच्या शिबीरासाठी प्रथम त्यांच्याकडे उपलब्ध असलेल्या शेडमधील रिक्त जागेचा वापर करावा. त्यानंतर खालील प्रमाणे तात्पुरत्या शेडची आखणी करावी :-

(i) शेडची जागा १५० पशुधनांना पुरेशी असेल असे, एका पेक्षा अधिक शेडची आवश्यकतेनुसार उभारणी करावी.

(ii) पहिल्या शेड मध्ये १ ते १५० पशुधन असतील, तर दुसऱ्या शेड मध्ये १५१ ते ३०० याप्रमाणे पशुधन शेड मध्ये ठेवण्यात यावेत.

(iii) शेड मधील पशुधनाचे ऊन व पावसापासून संरक्षण व्हावे, अशा प्रकारचे निवारा शेड असणे आवश्यक आहे. यासाठी येणारा खर्च संबंधित संस्थेने वर नमुद मुद्दा क्र ६ नुसार अनुज्ञेय असणाऱ्या निधीतूनच भागवावा लागेल. यासाठी, वेगळे अनुदान अनुज्ञेय असणार नाही.

(iv) मोठया पशुधनासाठी पिवळया रंगाचा बिल्ला व त्यावर पशुधनाचा नोंदणी क्रमांक तसेच लहान पशुधनासाठी लाल रंगाचा बिल्ला व त्यावर पशुधनाचा नोंदणी क्रमांक दर्शविण्यात यावा. याशिवाय पशुधनाच्या ओळखीसाठी ( Animal Ear Tag ) या साधनाचा वापर करण्यात यावा.

१४. शिबीरातील पशुधनाच्या सोयी-सुविधांसाठी आवश्यक असलेला भांडवली खर्च जसे, कडबा कुट्टी, पिण्याच्या पाण्याचा हौद बांधणे इत्यादी खर्च संबंधित गोशाळा संस्थेने स्वत:च्या भांडवलातून किंवा गोवंश गोवर्धन सेवा केंद्र योजनेच्या उपलब्ध अनुदानातून भागावावा.

१५. संबंधित गोशाळा संस्था चालकाने शिबिरासाठी चारा खरेदी करतांना, चारा उत्पादक शेतकरी/व्यापारी यांच्याकडून खरेदी केलेल्या चाऱ्यापोटी देण्यात येणारी रक्कम रेखांकीत धनादेशाद्वारे अदा करण्यात यावी.

१६. संबंधित गोशाळा संस्था चालकाने त्यांना वितरीत केलेल्या शासकीय अनुदानाचा हिशोब कायमस्वरुपी सुस्थितीत ठेवणे आवश्यक असून, शासकीय यंत्रणेकडून (शासन, जिल्हाधिकारी किंवा पशुसवंर्धन विभागातील उच्च अधिकारी ) मागणी करतील त्यावेळी हिशोबाचे कागदपत्र संबंधित अधिकाऱ्याकडे सादर करावीत.

१७. गोशाळा संस्था चालकाने शिबीरामध्ये आवश्यक तेवढी कडबा कुट्टी यंत्रे उपलब्ध करुन कुट्टी केलेला चारा वाटप करणे आवश्यक आहे. चाऱ्याला सकस करण्यासाठी शक्य असल्यास, मूरघास (सायलेज) चा वापर करावा.

१८. सर्व गरजू पशुपालकांची पशुधन, अटी व नियमांचे अधिन राहून शिबिरामध्ये दाखल करुन घेण्याची जबाबदारी संबंधित गोशाळा संस्थेची राहील. परंतु मर्यादित पशुधन संख्येच्या म्हणजे ३००० च्या वर पशुधन दाखल करता येणार नाही.

१९. प्रत्येक दिवसाचा पशुधनाचा दैनंदिन तक्ता, प्रत्येक पशुधनास दैनंदिन चारा व आहाराच्या परिमाणाचा तक्ता शिबीराचे दर्शनी भागात लावण्यात यावा.

२०. शिबीरात अधिकृत विद्युत पुरवठा असावा. रात्री आवश्यक इतका प्रकाश असावा.

२१. पशुधनासाठी पिण्याच्या पाण्याचा स्त्रोत शक्यतो स्थानिक असावा. संबंधित गोशाळा संस्था चालकाने पशुधनास आवश्यक तेवढे पाणी उपलब्ध करुन द्यावे, पुरेशा पाण्याची व्यवस्था संस्थेला करणे शक्य नसेल, त्या परिस्थितीत संबंधित जिल्हाधिकारी यांनी, पाणी पुरविण्याची व्यवस्था करावी.

२२. संबंधित गोशाळा संस्था चालकाने यासंदर्भात शासनाने घातलेल्या सर्व अटी व शर्ती मान्य असल्याबाबत ₹ १०० मुद्रांक पेपरवर बंधपत्र संबंधित जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त यांच्याकडे सादर करणे बंधकनकारक आहे.

२३. सदर शिबीर कोणतीही कारण न दाखवता बंद करण्याचे अधिकार शासनाने राखून ठेवलेले आहेत. या बाबतील संबंधित गोशाळा संस्था चालकास कोणत्याही न्यायालयात दाद मागता येणार नाही.

२४. उपरोक्त अटी व शर्ती पैकी काही अटी व शर्ती रद्द अथवा शिक्षील करण्याचा किंवा नविन सुयोग्य अटी व शर्ती समाविष्ट करण्याचा संपूर्ण अधिकार शासनाचा राहील.

***